# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
**शासन ज्ञापन क्र. संकीर्ण-१२१८/प्र.क्र.४८९/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९.

**विषय** :- पोलीस आयुक्त, नवी मुंबई, यांच्या आस्थापनेवरील पोलीस ठाणे, कोपरखैरणे, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम सिडकोमार्फत करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ कोपरखैरणे-सिडको-नवी-मुंबई/ ३४२/ २०१८, दिनांक ०४.१०.२०१८.

**ज्ञापन-**

पोलीस आयुक्त, नवी मुंबई, यांच्या आस्थापनेवरील पोलीस ठाणे, कोपरखैरणे, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीसाठी सिडकोकडून नवी मुंबई शहरातील कोपरखैरणे येथील सेक्टर २० मध्ये भूखंड क्र.७ *(१९३९.६१५ चौ.मी. क्षेत्रफळ)* हा पोलीस विभागास भाडेतत्त्वावर वाटप करण्यात आला आहे. दिनांक ०६.१०.२००८ रोजी उक्त भूखंडाचा ताबा घेण्यात आला असून तो ६० वर्षांसाठी भाडेकरारावर मिळावा म्हणून पोलीस महासंचालक, म.रा., यांनी सिडकोकडे रु.१,०५,८२६/- इतकी रक्कम भरली आहे.

२. यापूर्वी पोलीस आयुक्त, नवी मुंबई, यांच्या आस्थापनेवरील पोलीस ठाणे, कामोठे, पोलीस ठाणे, खारघर, आणि एन.आर.आय. सागरी पोलीस ठाणे यांच्या प्रशासकीय इमारती सिडकोने स्वतःच्या खर्चाने बांधून दिल्या आहेत. त्याचप्रमाणे पोलीस ठाणे, कोपरखैरणे, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारत बांधून देण्याबाबत सिडकोच्या संचालक मंडळाच्या दिनांक १७.१२.२०१४ रोजीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला.

३. म्हणून पोलीस ठाणे, कोपरखैरणे, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारत बांधून मिळण्यास प्रशासकीय मान्यता मिळावी, असा प्रस्ताव पोलीस महासंचालक, म.रा., यांनी सादर केला आहे.

४. त्या अनुसार, पोलीस आयुक्त, नवी मुंबई, यांच्या आस्थापनेवरील पोलीस ठाणे, कोपरखैरणे, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम हे सिडकोमार्फत करण्यास, याद्वारे, पुढील अटींवर, मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) उक्त बांधकामासाठी शासनाकडून (गृह विभाग) निधी किंवा साधने देण्यात येणार नाहीत.

२) उक्त बांधकाम हे महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. यांच्या नकाशाप्रमाणे व मानांकाप्रमाणे करण्यात यावे.

**५.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०२१२१८१२५६३९२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL
GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad0118449
3f2735ad885627, postalCode=400032, street=2ND
FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI,
serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b9532
2e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.02.12 18:17:25 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., मुंबई.
३) प्रधान सचिव (न.वि.-१), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई-४००६१४.
५) पोलीस आयुक्त, नवी मुंबई.
६) निवड फाईल, पोल-७.